**श्री.व्ही.एन.माने व श्रीम.जी.जी.गिरगांवकर या महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या सेवा महिला व बाल विकास विभागाकडे वर्ग करण्याबाबत / कायमस्वरुपी समावेशनाबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांकः मविसे१०/२०१४/प्र.क्र.८३/आस्था-३अ

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई-४०० ००१
तारीख: १ सप्टेंबर, २०१४

**वाचा:-**

१) **शासन निर्णय. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांकः मविसे-१०/प्र.क्र.१०४/(क)/२०११/आस्था-३, दिनांक ३ ऑगस्ट, २०१२**
२) **ग्राम विकास व जलसंधारण विभाग, पत्र क्रमांकः मविसे-१०/प्र.क्र.१०४/२०११/आस्था-३, दिनांक २६ सप्टेंबर, २०१२ व त्यासोबतचा विकल्प नमुना**
३) **ग्राम विकास व जलसंधारण विभाग, पत्र क्रमांकः मविसे-१०/प्र.क्र.१०४/२०११/आस्था-३, दिनांक २२ नोव्हेंबर, २०१२**
४) **शासन निर्णय. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांकः मविसे-१०/२०१३/प्र.क्र.४४ (ब)/आस्था-३(अ), दिनांक २८ मे, २०१३**

**प्रस्तावना:-**

महिला व बाल विकास विभागांतर्गतची उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बालकल्याण), गट-अ ची पदे आणि बाल विकास प्रकल्प अधिकारी, गट-ब ची पदे ग्राम विकास विभागाकडील अनुक्रमे महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ व गट-ब मधून भरली जातात. सदर पदांचे नियंत्रण म्हणजेच भरती प्रक्रिया व अन्य सेवाविषयक बाबी महिला व बाल विकास विभागाकडे सोपविण्याबाबत सदर विभागाकडून सातत्याने पाठपुरावा करण्यात येत असल्याने सदर पदे टप्प्या-टप्प्याने महिला व बाल विकास विभागाकडे हस्तांतरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तद्नुषंगाने दिनांक १३.६.२०१२ च्या मंत्रिमंडळ बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बालकल्याण) ची ३३ पदे आणि बाल विकास प्रकल्प अधिकाऱ्याची ४४९ पदे ग्राम विकास विभागाकडून महिला व बाल विकास विभागाकडे टप्प्या-टप्प्याने हस्तांतरीत करण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील ज्या अधिकाऱ्यांना महिला व बाल विकास विभागाअंतर्गतच्या बाल विकास प्रकल्प अधिकारी, गट-ब पदावर कायमस्वरुपी समावेशनाकरिता विहीत नमुन्यात विकल्प देण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये कळविण्यांत आले होते. त्यानुसार ज्या अधिकाऱ्यांनी विहीत मुदतीत विकल्प दिले होते, अशा अधिकाऱ्यांच्या सेवा संदर्भ क्र.४ च्या

आदेशान्वये महिला व बाल विकास विभागाकडे वर्ग करण्यांत आलेले आहेत. तथापि श्री.व्ही.एन.माने, बाल विकास प्रकल्प अधिकारी, दोडामार्ग, जिल्हा सिंधुदुर्ग आणि श्रीम.जी.जी.गिरगांवकर, तत्कालीन बाल विकास प्रकल्प अधिकारी, अर्धापूर, जिल्हा नांदेड यांनी त्यांच्या सेवा महिला व बाल विकास विभागाकडे वर्ग करण्याबाबत विहीत मुदतीत त्यांच्या कार्यालयांकडे विकल्प सादर केले होते. परंतु, क्षेत्रीय कार्यालयाकडून शासनाकडे त्यांचे विकल्प विहीत मुदतीत प्राप्त न झाल्याने, त्यांच्या सेवा महिला व बाल विकास विभागाकडे वर्ग करण्यांत आलेल्या नव्हत्या, आता विभागीय आयुक्त, कोकण विभाग आणि विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग यांनी त्यांच्या अनुक्रमे दि.१६.७.२०१३ आणि दि.१२.७.२०१३ च्या पत्रान्वये श्री माने आणि श्रीम. गिरगांवकर यांचे विकल्प, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग आणि जिल्हा परिषद, नांदेड यांनी विहीत मुदतीत त्यांच्याकडे व शासनाकडे पाठविले नसल्याने, श्री माने आणि श्रीम.गिरगांवकर यांच्या सेवा महिला व बाल विकास विभागाकडे वर्ग करण्यात आल्या नसल्याचे नमूद करून सदर विकल्प पुढील आवश्यक कार्यवाहीसाठी शासनाकडे पाठविले आहेत.

**शासन आदेश:-**

तद्नुषंगाने, श्री.व्ही.एन.माने, बाल विकास प्रकल्प अधिकारी, दोडामार्ग, जिल्हा सिंधुदुर्ग आणि श्रीम.जी.जी.गिरगांवकर, तत्कालीन बाल विकास प्रकल्प अधिकारी, अर्धापूर, जिल्हा नांदेड या महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील अधिकाऱ्यांनी महिला व बालविकास विभागाकडे वर्ग करण्याबाबत विहीत मुदतीत त्यांच्या संबंधित कार्यालयांकडे विकल्प सादर केलेले असल्याने, त्यांच्या सेवा सर्व आस्थापना विषयक बाबींसह महिला व बाल विकास विभागाकडे या शासन आदेशाद्वारे वर्ग करण्यात येत आहेत. सदर अधिकाऱ्यांना पदस्थापना देण्याबाबतची कार्यवाही महिला व बाल विकास विभागाने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०११२०८१८५६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: CN = SHINDE VIJAY DATTATRAYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD, CID - 917064
Reason: I am approving this document
Date: 2014.09.01 13:18:35 +05'30'

**(वि.द.शिंदे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

२. मा. मंत्री आणि मा. राज्यमंत्री, (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक
३. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
४. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहाय्यक
५. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
६. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
८. विभागीय आयुक्त (कोकण / औरंगाबाद)
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (नांदेड/ सिंधुदुर्ग)
१०. संबंधित अधिकारी (द्वारा-संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
११. सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१२), मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती.